अतिप्रदान व अखर्चित (अर्थसंकल्पीत) निधीचा परतावा शासनास भरणा (जमा) करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
**शासन परिपत्रक क्रमांकः बीजीटी-२०१५/प्र.क्र.७१/अर्थसंकल्प-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: ०४ मार्च, २०१५

**परिपत्रक**

मंत्रालयीन विभागाकडून अखर्चित निधीचा परतावा शासन खाती जमा करण्यासाठी जमा लेखाशिर्ष अवगत करण्याबाबत मार्गदर्शन /अभिप्रायार्थ नस्त्या वित्त विभागाकडे पाठविण्यात येत आहेत. त्या अनुषंगाने कळविण्यात येते की, सदर निधी हा शासनाच्या उत्पन्न तथा कर अथवा करेतर महसूल तथा जमा (Receipts) पैकी नसल्याने तो जमेच्या लेखाशिर्षाखाली शासनास भरणा करणे संयुक्तीक नाही. तसे केल्यास जमा/महसूल अकारण वाढल्याचे दिसून येते व जमेचे अंदाज/सुधारित अंदाज अवास्तव असल्याचे दिसून येते. त्यामुळे अतिप्रदानाची तथा शिल्लक निधीची वसूली व अखर्चित निधीचा परतावा शासन खाती भरणा करणेबाबत महालेखापालांकडील प्रकाशीत मुख्य व गौणशिर्ष सूचीच्या पुस्तकातील (List of Major and Minor Heads of Accounts) सर्वसाधारण सूचनांबाबत परिच्छेद ३.१० मध्ये निर्देश दिलेले आहेत. त्यानुसार पुढीलप्रमाणे भरणा करण्यात यावा.

१) चालू वर्षातील अति प्रदानाची वसूली व अखर्चित निधीचा परतावा शासन खाती भरणा करतांना संबंधित खर्चाच्या मुख्य लेखाशिर्षाखाली खर्चातील कपात (Reduction in the expenditure)असा नमुद करुन भरणा करण्यात यावा.

२) मागील वर्षातील अति प्रदानाची वसूल व अखर्चित निधीचा परतावा शासन खाती भरणा करतांना संबंधित खर्चाच्या मुख्यलेखाशिर्षाखाली अनुक्रमे गौणशिर्ष ९११- अतिप्रदानाची वजा वसूली व ९१२- अखर्चित निधीची वजा वसूली असे नमुद करुन भरणा करण्यात यावा.

२. यापुढे शिल्लक व अखर्चित निधी शासन जमा करणेबाबत मार्गदर्शनार्थ /अभिप्रायार्थ नस्त्या वित्त विभागाकडे न पाठविता वरीलप्रमाणे कार्यवाही करावी.

३. प्रस्तुत शासन परिपत्रक महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र यांच्या सहमतीने (अनौपचारीक संदर्भ क्र. सं: ख.वि/चा-१/वित्त विभाग/यूओआर-२०१/२०१४-१५/ २४१, दिनांक २.३.२०१५) निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०३०४१६१९११२४०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHOK NARAYAN BHOSALE

Digitally signed by ASHOK NARAYAN BHOSALE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=ASHOK NARAYAN BHOSALE
Date: 2015.03.04 16:29:36 +05'30'

( अ. ना. भोसले )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,सर्व मंत्रालयीन विभाग , मंत्रालय, मुंबई.

२) सह सचिव / उप सचिव (अर्थसंकल्प शाखा), सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा),महाराष्ट्र-१,मुंबई.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा),महाराष्ट्र-२,नागपूर .
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
७) संचालक,लेखा व कोषागारे,संगणक शाखा,नवीन प्रशासन भवन,५वा मजला, मंत्रालयासमोर,मुंबई.
८)अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१०) निवड नस्ती, अर्थसंकल्प-२, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.